**डॉ. बंदोरवाला, कुष्ठरोग रुग्णालय, कोंढवा, पुणे** यांच्या ताब्यातील सर्वे नं.३८ व ३९ मधील ११.१हेक्टर जमीन **राष्ट्रीय प्राकृतिक चिकित्सा संस्था, पुणे** या संस्थेस नियोजित रुग्णालय व निसर्गोपचार महाविद्यालयासाठी देण्यासाठी महसूल व वन विभागाकडे प्रत्यार्पित करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०१२/प्रक्र-३६८/आरोग्य ३(अ)**
गो.ते.रुग्णालय संकुल इमारत, ए विंग, १० वा, मजला,
मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
दिनांक: ०३ सप्टेंबर,२०१५

वाचा :-

1) **आयुक्त,पुणे विभाग,पुणे यांचे क्रमांक.मह-२/जमीन-पुणे /कावि /१७६/२०१२, दि.२७.०३.२०१२ चे पत्र**
2) **संचालक,राष्ट्रीय प्राकृतिक चिकीत्सा संस्था, पुणे यांचे पत्र क्र.NIN/Land-Hos-Pune/२०१२-१३/२३२१/ दिनांक-१८.०७.२०१३ चे पत्र**

**प्रस्तावना -:**

डॉ. बंदोरवाला, कुष्ठरोग रुग्णालय, कोंढवा, पुणे यांच्या ताब्यातील सर्व्हे नं.३८ व ३९ मधील १० हेक्टर जमीनीची मागणी संचालक, राष्ट्रीय प्राकृतिक चिकित्सा संस्था, पुणे यांनी नियोजित रुग्णालय व निसर्गोपचार महाविद्यालयासाठी केली आहे. राष्ट्रीय प्राकृतिक चिकित्सा संस्था ही केंद्रशासनाच्या आरोग्य व कुटूंब कल्याण मंत्रालयांतर्गत स्वायत्त संस्था असून केंद्रशासन नियंत्रित व अनुदानित आहे. त्यामुळे या संस्थेसाठी डॉ. बंदोरवाला, कुष्ठरोग रुग्णालय, कोंढवा, पुणे यांच्या ताब्यातील सर्व्हे क्र. ३८ मधील ७.०१ हे. आर व सर्व्हे नं. ३९ मधील ४ हे.आर अशी एकूण ११.०१ हेक्टर आर जमीन महसूल विभागाकडे प्रत्यार्पित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-:**

सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अखत्यारितील डॉ. बंदोरवाला, कुष्ठरोग रुग्णालय, कोंढवा, पुणे यांच्या ताब्यातील सर्व्हे क्र. ३८ मधील ७.०१ हे. आर व सर्व्हे नं. ३९ मधील ४ हे.आर अशी एकूण ११.०१ हेक्टर आर जमीन राष्ट्रीय प्राकृतिक चिकित्सा संस्था, पुणे यांना नियोजित रुग्णालय व

निसर्गोपचार महाविद्यालयासाठी हस्तांतरीत करण्यासाठी महसुल व वन विभाग ( जिल्हाधिकारी, पुणे ) यांचेकडे वर्ग करण्यास सार्वजनिक आरोग्य विभागाची मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१५०८२८१६५७४७२४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shekhar Vasantrao Dhawale

Digitally signed by Shekhar Vasantrao Dhawale
DN: CN = Shekhar Vasantrao Dhawale, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.09.03 17:17:01 +05'30'

**(शेखर ढवळे)**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. प्रधान सचिव,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
३. जिल्हाधिकारी, पुणे.
४. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा,पुणे मंडळ, पुणे.
६. जिल्हा शल्य चिकीत्सक, पुणे
७. संचालक, राष्ट्रीय प्राकृतिक चिकित्सा संस्था, पुणे
८. प्रशासक, डॉ. बंदोरवाला, कुष्ठरोग रुग्णालय, कोंढवा, पुणे
९. महालेखापाल-१ (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
१०.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
११.निवडनस्ती (आ-३ अ)